गट-क व गट-ड (पूर्वीचे वर्ग-3 व वर्ग-4) मधील कर्मचा-यांना पदोन्नतीच्या संधी उपलब्ध नसल्याने असलेली कुंठीतता घालविण्यासंबंधीची योजना.

मुद्यांचे स्पष्टीकरण.

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय,क्रमांक-एसआरव्ही-1096/प्र.क्र.33/95/बारा,
मंत्रालय,मुंबई-400 032,
दिनांक 20 मार्च,1997

संदर्भ: 1) शासन निर्णय,सा.प्र.वि. क्रमांक-एसआरव्ही-1095/प्र.क्र.1/95/बारा, दिनांक 8 जून,1995.

2) शासन निर्णय,सा.प्र.वि. क्रमांक-एसआरव्ही-1095/प्र.क्र.33/95/12, दिनांक 1 नोव्हेंबर,1995.

## शासन निर्णय

शासन सेवेत गट-क व गट-ड संवर्गात पदोन्नतीच्या संधी उपलब्ध नाहीत किंवा उपलब्ध असल्या तरी पदोन्नती मिळण्यास प्रदीर्घ कालावधी लागतो. अशा कर्मचा-यांना 12 वर्षांच्या नियमित सेवेनंतर वरिष्ठ पदाची वेतनश्रेणी देण्याबाबतचे आदेश संदर्भाधीन दि. 8 जून,1995 रोजीच्या शासन निर्णयाद्वारे निर्गमित करण्यात आले आहेत. वरिष्ठ वेतनश्रेणी देण्याबाबत अवलंबावयाची कार्यपध्दत, अटी व शर्ती देखील सदर शासन निर्णयात नमूद करण्यात आल्या आहेत.

2. 12 वर्षांच्या नियमित सेवेनंतर वरिष्ठ पदाची वेतनश्रेणी देण्याबाबतच्या योजनेची प्रत्यक्ष अंमलबजावणी करताना तसेच त्या अनुषंगाने विभागांना येणा-या अडचणीबाबत काही शंका उपस्थित करण्यात आलेल्या होत्या, त्याबाबत वर नमूद केलेल्या संदर्भ क्र. 2 अन्वये स्पष्टीकरण करण्यात आले आहे. तद्नंतरही काही मुद्यांच्या बाबतीत संदिग्धता राहिली असल्याचे या विभागाच्या निदर्शनास आणण्यात आले आहे, त्यानुसार संबंधीत मुद्यांवर स्पष्टीकरण करुन आदेश निर्गमित करण्याचे विचाराधीन होते, त्यानुसार संबंधीत मुद्यांवरील स्पष्टीकरण सोबत जोडण्यात आलेल्या परिशिष्टात देण्यात आले आहे.

3. सर्व विभागांनी आणि सदर योजना राबविणा-या अधिका-यांनी त्यांच्याकडील कर्मचा-यांची प्रकरणे निकालात काढताना सदर स्पष्टीकरणात्मक सूचनाप्रमाणे कार्यवाही करावी.

4. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-300/सेवा-3, दिनांक 27.2.1997 अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

य.मा. जोशी
सह सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपालांचे सचिव,राजभवन, मलबार हिल,मुंबई,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
× प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा,मुंबई,
× प्रबंधक, उच्च न्यायालय,अपील शाखा,मुंबई,
× प्रबंधक,लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय,मुंबई,
× सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई,
× सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा),मुंबई,
× सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद),मुंबई,
महालेखापाल-1 (लेखा परीक्षा),महाराष्ट्र,मुंबई,
महालेखापाल-2 (लेखा व परीक्षा),महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-1 (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र,मुंबई,
महालेखापाल-2 (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र,नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक (निवासी लेखे), कोकण भवन,नवी मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निरनिराळया मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
वित्त विभाग- सेवा-3,
निवड नस्ती.

शासन निर्णय क्रमांक-एसआरव्ही-1096/प्र.क्र.5/96/बारा, दिनांक 20 मार्च,1997 चे परिशिष्ट

| अ.क्र. | उपस्थित मुद्दा | स्पष्टीकरण |
| --- | --- | --- |
| 1. | सामान्य प्रशासन विभागाच्या दि.8 जून,1995 च्या शासन निर्णयातील परि.2 मधील (ई) मध्ये नमूद केल्याप्रमाणे गट-क मधील पदधारकांना गट-ब मधील राजपत्रित पदावर पदोन्नती जरी मिळणार नसली तरी वरची वेतनश्रेणी अनुज्ञेय आहे किंवा कसे, | परि.2 मधील (ई) मध्ये नमूद केल्याप्रमाणे गट-क मधील पदधारकांना गट-ब मधील राजपत्रित पदावर पदोन्नती देण्यात येणार नसली तरी, 12 वर्षांची नियमित सेवा झाल्यानंतर या योजनेअंतर्गत बाब क्र.2 (ब) प्रमाणे वरची वेतनश्रेणी मिळण्यास पात्र ठरत असेल, तर राजपत्रित पदाची वरची वेतनश्रेणी देण्यास हरकत नसावी. |
| 2. | सेवाप्रवेशोत्तर किंवा विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झाल्यामुळे परीक्षा नियमातील तरतुदीनुसार ज्येष्ठता गमावली आहे, त्यांच्या बाबतीत विभागीय परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर वरची वेतनश्रेणी केव्हा देण्यात यावी.. | या संदर्भात मूळ निर्णयामधील परि.2 (ब) मध्ये स्पष्ट केल्याप्रमाणे अर्हतापरीक्षा किंवा विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. अर्हतापरीक्षा किंवा विभागीय परीक्षा विहित संधीत/मुदतीत उत्तीर्ण न झाल्यामुळे ज्येष्ठता गमावली असेल अशा कर्मचाऱ्यास त्याची सुधारित ज्येष्ठता निश्चित करुन त्या ज्येष्ठता सूचीवरील त्याच्या कनिष्ठास जर कालबध्द पदोन्नती म्हणून वरची वेतनश्रेणी मिळत असेल तर अन्यथा पात्र ठरत असल्यास त्या कनिष्ठास दिलेल्या तारखेपासून वरची वेतनश्रेणी देण्यात यावी. |
| 3. | शासन निर्णय,सा.प्र.वि.क्रमांक-एसआरव्ही-1088/प्र.क्र.13/88/12, दि.29 जुलै,1993 अन्वये रु. 1640-2900 आणि रु.2000-3200 या वेतनश्रेणीतील पदधारकाला गट-ब (अराजपत्रित) संवर्गात वर्गीकृत करण्यात आले आहे. तथापि, पूर्वी त्याचे वर्गीकरण वर्ग-3 (अराजपत्रित) म्हणून समजले जात होते. त्या पदधारकाला वरची वेतनश्रेणी देण्यात यावी किंवा कसे, | वरील मुद्दा 1 मध्ये स्पष्ट केल्याप्रमाणे या पदधारकांना वरची वेतनश्रेणी देण्यास हरकत नसावी. |